**ब्रिलीयंट टेक्नीकल इन्स्टिट्युट बेंबळी, ता.जि.धाराशीव संचलित श्री.सिध्दाराम म्हेत्रे मतिमंद मुलांची निवासी शाळा, नारीवाडी, ता.बार्शी, जि.सोलापूर या मतिमंद प्रवर्गातील विशेष शाळेचे मु.पो.अंबेवाडी, ता.जि.धाराशीव येथे स्थलांतर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३२/दि.क.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०५ एप्रिल, २०२३.

**वाचा:-** १) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक दिकआ/प्र-४-मति/ ब्रिलीयंट/ स्थलांतरण/उस्मानाबाद/ २०२२-२३, दिनांक ०१.०६.२०२२.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इडीडी- २०१७/ प्र.क्र.६/अ.क.१ दिनांक १६ सप्टेंबर,२०१७.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्रमांक इडीडी-२०१७/ प्र.क्र.६/दि.क.१,दि.१५.०२.२०१९.

**प्रस्तावना :-**

ब्रिलीयंट टेक्नीकल इन्स्टिट्युट बेंबळी, ता.जि.धाराशीव संचलित श्री.सिध्दाराम म्हेत्रे मतिमंद मुलांची निवासी शाळा, नारीवाडी, ता.बार्शी, जि.सोलापूर या शाळेस नोंदणी प्रमाणपत्र क्रमांक ०८९२, दि.२४.०३.२००५ असून त्याचे दि.०१.१०.२०२६ या कालावधीपर्यंत नुतनीकरण केलेले आहे. संस्थेने मु.पो.अंबेवाडी, ता.जि.धाराशीव येथे शाळेकरीता कायमस्वरुपी (अनुज्ञप्ती नोंदणी प्रमाणपत्र असेपर्यंत) भाड्याने सर्व सोयी सुविधायुक्त इमारत घेतली असल्याने शाळा स्थलांतर करण्यास परवानगी मिळण्याचा प्रस्ताव जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, धाराशीव तसेच आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी शासनाकडे शिफारशीसह पाठविला होता.

संस्थेने मुळ शाळेतील सर्व प्रशासकीय मान्यता प्राप्त कर्मचाऱ्यांना पूर्ववत सेवेत सामावून घेण्याचे तसेच प्रवेशित विद्यार्थ्यांना स्थलांतरीत ठिकाणी प्रवेश देण्याचे हमीपत्र सादर केले आहे. शाळा स्थलांतरणास पालकांचे संमतीपत्र सादर केले आहे. शाळेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना दिव्यांग व्यक्ती समान संधी हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग अधिनियम, २०१६ तसेच दिव्यांग शाळा संहिता, २०१८ मध्ये शासनाने ठरवून दिलेले निकष, नियम व निर्णयाचे अनुषंगाने अत्यावश्यक सोयी सुविधा मिळण्याच्या दृष्टीने संस्थेने सादर केलेले मागणीपत्र, कार्यकारी मंडळाचा ठराव, कर्मचारी संमतीपत्र प्रस्तावासोबत सादर केले आहेत. त्यानुषंगाने ब्रिलीयंट टेक्नीकल इन्स्टिट्युट बेंबळी, ता.जि.धाराशीव संचलित श्री.सिध्दाराम म्हेत्रे मतिमंद मुलांची निवासी शाळा, नारीवाडी, ता.बार्शी, जि.सोलापूर या मतिमंद प्रवर्गातील विशेष शाळेचे मु.पो.अंबेवाडी, ता.जि.धाराशीव येथे स्थलांतर करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

ब्रिलीयंट टेक्नीकल इन्स्टिट्युट बेंबळी, ता.जि.धाराशीव संचलित श्री.सिध्दाराम म्हेत्रे मतिमंद मुलांची निवासी शाळा, नारीवाडी, ता.बार्शी, जि.सोलापूर या मतिमंद प्रवर्गातील विशेष शाळेचे मु.पो.अंबेवाडी (बेंबळी), ता.जि.धाराशीव येथे स्थलांतर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर संस्थेला दिव्यांग विशेष शाळा मान्यता व अनुदान या योजनेचे अस्तित्वात असेलेले नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणारे नियम बंधनकारक राहतील.

३. सदर विशेष शाळेच्या स्थलांतरणाबाबतची सर्व प्रक्रिया तीन महिन्याच्या कालावधीत पूर्ण करावी व त्याबाबतचा अहवाल आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी शासनास सादर करावा.

४. सदर विशेष शाळेच्या स्थलांतरणाबाबतचा सर्व खर्च संबधीत संस्थेला करावा लागेल. सदर खर्चाची प्रतिपूर्ती देय असणार नाही.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०४०६१४४६५४२४३५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE

Digitally signed by VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPT., 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AB69D6945F8950A9525831F8AE9726BE295D17576E78D19FA8F6CB952BB04A0, cn=VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
Date: 2023.04.06 14:52:45 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) सचिव (दिव्यांग कल्याण), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग,लातूर/पुणे.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद-धाराशीव/सोलापूर.
६) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हापरिषद-धाराशीव/सोलापूर.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
८) जिल्हा कोषाधिकारी, धाराशीव/सोलापूर.
९) अध्यक्ष / सचिव, ब्रिलीयंट टेक्नीकल इन्स्टिट्युट बेंबळी, ता.जि.धाराशीव संचलित श्री.सिध्दाराम म्हेत्रे मतिमंद मुलांची निवासी शाळा, नारीवाडी, ता.बार्शी, जि.सोलापूर या मतिमंद प्रवर्गातील विशेष शाळेचे मु.पो.अंबेवाडी, ता.जि.धाराशीव
१०) निवडनस्ती (दिव्यांग कल्याण -१).